**इयत्ता १ ली ते ५ वी साठी मराठी व इंग्रजी माध्यमांच्या राज्य मंडळाच्या शाळांमध्ये हिंदी भाषेच्या अनिवार्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२०२५/प्र.क्र.९४/ एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ जून, २०२५

**संदर्भ** :-

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्रमांक - संकीर्ण २०२५/प्र.क्र.९४ /एस.डी.-४, दिनांक १६ एप्रिल, २०२५

**शासन शुध्दिपत्रक :-**

संदर्भाधीन शासन निर्णयातील अनु. क्र. ३ येथील 'भाषाविषयक धोरण' या शीर्षकाखालील उपपरिच्छेदामध्ये खालीलप्रमाणे नमूद करण्यात आले आहे :-

"राज्य अभ्यासक्रम आराखडा शालेय शिक्षण २०२४ नुसार यापुढे इयत्ता १ ली ते ५ वी साठी मराठी व इंग्रजी माध्यमांच्या शाळांमध्ये हिंदी ही तृतीय भाषा म्हणून अनिवार्य असेल. अन्य माध्यमांच्या शाळांमध्ये इयत्ता पहिली ते पाचवीसाठी माध्यम भाषा, मराठी व इंग्रजी अशा तीन भाषा अभ्यासल्या जातील. इयत्ता ६ वी ते १० वी करिता भाषा धोरण हे राज्य अभ्यासक्रम आराखडा-शालेय शिक्षण प्रमाणे असेल."

**या ऐवजी खालीलप्रमाणे वाचावे :-**

" राज्य अभ्यासक्रम आराखडा शालेय शिक्षण २०२४ नुसार मराठी व इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये यापुढे इयत्ता १ ली ते ५ वी साठी हिंदी ही सर्वसाधारणपणे तृतीय भाषा असेल; परंतु या विद्यार्थ्यांनी हिंदी या तृतीय भाषेऐवजी इतर भारतीय भाषांपैकी एक भाषा ही तृतीय भाषा म्हणून शिकण्याची इच्छा दर्शविल्यास, त्या विद्यार्थ्यांना ती भाषा तृतीय भाषा म्हणून शिकण्यास मान्यता देण्यात येईल. तथापि, हिंदी ऐवजी इतर भाषा ही तृतीय भाषा म्हणून शिकण्यास इच्छुकता दर्शविणाऱ्या विद्यार्थ्यांची त्यांच्या शाळेतील इयत्तानिहाय संख्या ही किमान २० इतकी असणे आवश्यक राहील. हिंदी ऐवजी इतर तृतीय भाषा शिकण्याकरिता उपरोक्तप्रमाणे विहित किमान २० विद्यार्थ्यांनी इच्छुकता दर्शविल्यास, त्या भाषेच्या अध्यापनाकरिता शिक्षक उपलब्ध करून देण्यात येईल अन्यथा सदर भाषा ही ऑनलाइन पध्दतीने शिकविण्यात येईल. सर्व माध्यमांच्या शाळांमध्ये मराठी अनिवार्य भाषा असेल. या कार्यवाहीसंबंधीचे सर्व नियोजन हे आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र

राज्य, पुणे यांच्यास्तरावरून तात्काळ करण्यात येईल. मराठी व इंग्रजी माध्यमाच्या शाळांव्यतिरिक्त अन्य माध्यमांच्या शाळांमध्ये इयत्ता पहिली ते पाचवीसाठी माध्यम भाषा, मराठी व इंग्रजी अशा तीन भाषा अभ्यासल्या जातील. इयत्ता ६ वी ते १० वी करिता भाषा धोरण हे राज्य अभ्यासक्रम आराखडा -शालेय शिक्षण प्रमाणे असेल."

**२.** सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०६१७२२३३५९३४२१ असा आहे. हे शासन शुध्दिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811 8634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F 7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.06.17 22:34:56 +05'30'

**( तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र, मुंबई.
६. मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
८. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, महिला व बाल विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व मा. विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव (शालेय शिक्षण), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. विभागीय आयुक्त (सर्व).
१७. जिल्हाधिकारी (सर्व).
१८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२१.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
२२.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.

२३. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यास संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
२४.शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२६. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
२७. प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व).
२८. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना).
२९. निवडनस्ती (एस.डी.४)